राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील
कुटूंबाकरिता सुवर्णमहोत्सवी ग्रामीण निवारा
हक्क मोहिम राबविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृहनिर्माण विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्र.रागांयो-२००९/प्र.क्र.१८०/गृनिधो-१
दिनांक : २१ ऑगस्ट, २००९

सन २००९-१० हे वर्ष महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचे सुवर्ण महोत्सवी वर्ष म्हणून साजरे केले जात आहे. प्रगत अशा महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचा सुवर्ण महोत्सव साजरा करीत असताना राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील आजही बेघर असणाऱ्या सुमारे ६,००,००० कुटुंबांना येत्या तीन वर्षाच्या काळात घरकुले उपलब्ध करुन देण्यासाठी एक महत्वाकांक्षी योजना राबविण्याची तसेच सध्या अस्तित्वात असलेल्या योजनेत घरकुले बांधण्यासाठी लागणाऱ्या साहित्याच्या बाजारमूल्यात तसेच मजुरीच्या दरात झालेली वाढ विचारात घेऊन घरकुले बांधण्यासाठी लाभार्थ्यांना द्यावयाच्या राज्य शासनाच्या अनुदानात पुरेशा प्रमाणात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुलक्षून शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

(एक) सुवर्ण महोत्सवी महाराष्ट्र ग्रामीण निवारा हक्क कार्यक्रमांतर्गत राज्याच्या ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील बेघर कुटुंबांकरिता सन २००९-१०, २०१०-११ व २०११-१२ या आर्थिक वर्षात पुढीलप्रमाणे प्रतीवर्षी २,४५,००० घरकुले बांधण्यात येतील.

| अ.क्र. | योजनेचे नाव | घरकुलांची संख्या |
|---|---|---|
| १. | राजीव गांधी ग्रामीण निवारा योजना क्र.१(सुधारीत) | २१,००० |
| २. | इंदिरा आवास योजना | |
| | (क) सर्वसाधारण गट | १,०२,४४० |
| | (ख) आदिवासी योजना | ४०,५२० |
| | (ग) अनुसूचित जाती योजना | ८१,०४० |
| | **एकूण** | २,४५,००० |

(दोन) वरील २,४५,००० घरकुलांपैकी २१,००० घरकुले शासनाच्या गृहनिर्माण विभागाच्या योजनेतून व २,२४,००० घरकुले ग्राम विकास विभागाच्या ग्रामीण गृहनिर्माण (इंदिरा आवास ) योजनेतून बांधण्यात येतील.

(तीन) या कार्यक्रमांतर्गत बांधावयाच्या प्रत्येक घरकुलाचे चटई क्षेत्र २६९ चौ.फूट इतके असेल.

(चार) या योजनेतून बांधावयाच्या घरकुलाची खर्च मर्यादा रु.७०,०००/-इतकी असेल. त्यापैकी रु.६८,५००/- इतकी रक्कम लाभार्थी कुटुंबाला अनुदानाच्या स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येईल. उर्वरित रु.१,५००/- इतकी रक्कम लाभार्थीला स्वतः उपलब्ध करुन द्यावी लागेल.

(पाच) ज्या लाभार्थ्यांकडे घर बांधण्यासाठी स्वतःची जागा नाही अशा लाभार्थ्यांना आवश्यकतेनुसार जमीन उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी करतील.

(सहा) या योजनांतील घरकुलांची बांधणी लाभार्थी स्वतः करतील.

(सात) वरील योजनेची अंमलबजावणी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत करण्यात येईल.

(आठ) या योजनेच्या अंमलबजावणीवरील प्रशासकीय खर्च भागविण्यासाठी प्रती घरकुल रु. १००/- प्रमाणे सादिल निधी घरकुलांच्या किंमती व्यतिरीक्त संबंधित जिल्हा विकास यंत्रणांना संबंधित विभागाकडून देण्यात येईल.

(नऊ) हा कार्यक्रम राबविण्यासाठी ग्रामविकास विभागाला सर्वसाधारण (जनरल) घटकांसाठी रु.३३१.८४ कोटी रुपयांचा अतिरिक्त नियतव्ययाच्या मंजूरीची आवश्यकता भासणार आहे. गृहनिर्माण विभागाकडील मंजूर नियतव्ययापैकी शिल्लक असलेले रु.९१.१५ कोटी व ग्रामविकास विभागाच्या यशवंत ग्रामसमृध्दी योजनेचे १२३.९१ कोटी असे एकूण २१५.०६ कोटी रु. या कार्यक्रमासाठी ग्रामविकास विभागाकडे वळते करण्यात येतील. उर्वरीत रु. ११६.७८ कोटीचा खर्च भागविण्यासाठी नियोजन विभागाने ग्रामविकास विभागास अतिरिक्त नियतव्यय उपलब्ध करुन द्यावा.

(दहा) सामाजिक न्याय विभागाने चालू आर्थिक वर्षात ग्रामविकास विभागाला दिलेल्या रु. ६० कोटीच्या निधीव्यतिरिक्त आणखी रु. २८२.३९ कोटींचा निधी उपलब्ध करुन द्यावा.

(अकरा) आदिवासी विभागाने ग्रामविकास विभागाला उपलब्ध करुन दिलेल्या रु. ४९.१० कोटी निधी व्यतिरिक्त चालू वर्षात आणखी रु. १२२.०९ कोटी इतका निधी उपलब्ध करुन द्यावा.

(बारा) ही मोहिम राबविण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यावर राहील व त्यांचे मुल्यांकन या मोहिमेअंतर्गत त्यांनी साध्य केलेल्या लक्ष्याच्या अनुषंगाने करण्यात येईल. विभागीय आयुक्तांनी विभागीय बैठकांत या योजनेचा आढावा घ्यावयाचा आहे व ही मोहिम गतिमान करावयाची आहे.

(तेरा) या कार्यक्रमातील घरकुलांचे जिल्हा, तालुका व गावस्तरावर उद्दिष्ट निश्चित करणे, लाभार्थ्यांच्या पात्रतेचे व निवडीचे निकष, अनुदान वितरीत करण्याची कार्यपध्दती, आरक्षण व प्राथम्यक्रम इत्यादीबाबतचे निकष, अटी/शर्ती व योजनेच्या अंमलबजावणींची इतर सर्व पध्दत ही केंद्र शासन पुरस्कृत इंदिरा आवास योजनेप्रमाणेच राहील.

(चौदा) सदर शासन निर्णय हा ग्रामविकास व जलसंधारण विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

(पंधरा) हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०८२५१६५७१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

सहि/-
(सीताराम कुंटे)
सचिव, गृहनिर्माण विभाग

प्रति,

१) मा. राज्यपालांचे सचिव(पत्राद्वारे)
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. जिल्हा पालकमंत्री (सर्व जिल्हे)
४) मा. राज्यमंत्री(गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा,
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा,

८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०)सर्व जिल्हाधिकारी,
११)उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१.
१२)उपमुख्य उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी(लेखा) कोकण विभाग, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
१३)अध्यक्ष, जिल्हा परिषद(सर्व)
१४)मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(सर्व)
१५)प्रकल्प अधिकारी, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा(सर्व)
१६)कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद,(सर्व)
१७)सहाय्यक ए.डी.टी.पी./नगररचना विभाग,(सर्व)
१८)सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९)वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२०)निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२१)मुख्य अधिकारी, गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, कोकण, नागपूर, औरंगाबाद, पुणे, नाशिक व अमरावती.
२२)महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३)ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४)सहसंचालक, लेखा व कोषागारे,(कॉम्प्युटर सेल) नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
२५)सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६)अवर सचिव(अर्थसंकल्प), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२७)सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२८)निवड नस्ती(गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**राज्यातील ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील कुटूंबाकरिता सुवर्णमहोत्सवी ग्रामीण निवारा हक्क मोहिम राबविण्याबाबत प्रत्येक जिल्ह्याला ठरवून दिलेले २००९-२०१० चे उद्दिष्ट.**

| अ.क्र. | जिल्हा | उद्दिष्ट |
|---|---|---|
| १. | ठाणे | २१३२० |
| २. | रायगड | ७४७६ |
| ३. | रत्नागिरी | ४६६९ |
| ४. | सिंधुदुर्ग | २९८१ |
| ५. | नाशिक | १५९४२ |
| ६. | धुळे | ६४५९ |
| ७. | जळगाव | १६०४४ |
| ८. | अहमदनगर | १६४१४ |
| ९. | नंदुरबार | ७९७१ |
| १०. | पुणे | १३४८१ |
| ११. | सोलापूर | १८७४८ |
| १२. | कोल्हापूर | ६१७७ |
| १३. | सांगली | ७३७६ |
| १४. | सातारा | ६४९८ |
| १५. | अमरावती | ६७७४ |
| १६. | यवतमाळ | ७२८७ |
| १७. | अकोला | २९१६ |
| १८. | बुलढाणा | ४३५४ |
| १९. | वाशिम | २००९ |
| २०. | औरंगाबाद | ७७१७ |
| २१. | उस्मानाबाद | ४२६९ |
| २२. | परभणी | २८१६ |
| २३. | बीड | ५८९७ |
| २४. | जालना | ३८८७ |
| २५. | नांदेड | १५०४७ |
| २६. | हिंगोली | २०२० |
| २७. | लातूर | ४९४४ |
| २८. | नागपूर | ६३८७ |
| २९. | चंद्रपूर | ६६७३ |
| ३०. | गडचिरोली | ५५०५ |
| ३१. | भंडारा | ३२२५ |
| ३२. | वर्धा | ३८२४ |
| ३३. | गोंदिया | ४४९१ |
| एकूण | | २,५१,५९८ |